प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,यवतमाळ यांच्या
कार्यालयीन इमारतीच्या व कर्मचारी
निवासस्थानाच्या बांधकामाचा प्रस्ताव

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीजीटी १००६/प्र.क्र.२७५/इएक्ससी-४,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : 29 एप्रिल, २००८.

वाचा : आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे प.क्र. बीएलडी ११२००६ २९७०१/सहा, दि. १.२.२००८.

शासन निर्णय : सन २००७-०८ या वार्षिक योजनेसाठी राज्य उत्पादन शुल्क विभागाला कार्यालयीन इमारती/निवासी इमारती बांधण्यासाठी रु. ५५०.०० लक्ष एवढा नियतव्यय मंजूर करण्यात आलेला आहे. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, यवतमाळ यांच्या अधिपत्याखालील कार्यालयीन इमारत व कर्मचारी निवासस्थान या बांधकामाच्या प्रस्ताव कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी साक्षांकित केलेला आहे. सदर बांधकामासाठी रु. १,२९,०५,६००/- इतका अपेक्षित खर्च असल्याचे अंदाज अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,यवतमाळ यांनी कळविले आहेत. सदर अंदाज हे सन २००७-०८ च्या दरसूचीवर असल्यामुळे रु. १,२९,०५,६००/- इतक्या रकमेस सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर बांधकाम हे विभागाच्या मालकीच्या जागेवर बांधावयाचे प्रस्तावित आहे.

३. प्रस्तुत इमारतीची कामे वास्तुशास्त्रज्ञ मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावीत.

४. उपरोक्त कामावर होणारा खर्च सन २००८-०९ या वित्तीय वर्षात सार्वजनिक बांधकाम विभाग, मागणी क्र.एच-८,मुख्य लेखाशीर्ष-४०५९,सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च,०१, कार्यालयीन इमारती, १०१, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ( १५ ) दारुबंदी व राज्य उत्पादन शुल्क (योजनांतर्गत ) याखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-५ अनुक्रमांक-१, अन्वये "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका "अंतर्गत परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. मु. काकड )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-१/२( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
विभागीय उप आयुक्त,नागपूर विभाग,नागपूर.
अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,यवतमाळ
जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ,यवतमाळ.
सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमारती-२)(अर्थ-२), मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-७/विनियम ) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती/इएक्ससी-४

********